**पर्यावरण व वातावरणीय बदल विभागासाठी सल्लागार संस्थेची नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
शासन शुध्दीपत्रक क्रमांकः एमईडब्ल्यु-२०२०/प्र.क्र.१०८/तां.क. १
१५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: - ०७ एप्रिल, २०२५

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय माहिती व तंत्रज्ञान संचालनालय क्रमांक GAD-IT०८०/४/२०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दिनांक ०५/१०/२०२३

२) पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, शासन निर्णय क्रमांक एमईडब्ल्यु २०२४/प्र.क्र.१०८/ तां.क. १, दिनांक २१/०३/२०२५.

**<u>प्रस्तावना</u> :-**

पर्यावरण व वातावरणीय बदल विभागांतर्गत विविध पर्यावरण विषयक नाविन्यपूर्ण उपक्रमांची अंमलबजावणी करण्याच्या प्रयोजनार्थ माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाचा शासन निर्णय, दिनांक ०५.१०.२०२३ मधील विहित केलेल्या मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करून पर्यावरण व वातावरणीय बदल विभागासाठी सल्लागार संस्थेची निवड करण्यासाठी सदर समितीने केलेली शिफारस व शासन मान्यतेने पर्यावरण व वातावरणीय बदल विभागासाठी व विभागातंर्गत येणाऱ्या संचालक, माझी वसुंधरा अभियान आणि संचालक, राज्य वातावरणीय कृती कक्ष या कार्यालयात सल्लागार नियुक्ती करण्यासाठी मे.प्रायमस पार्टनर्स प्रा.लि. या संस्थेची संदर्भ क्रमांक ०२ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार संस्थेकडून पुरविण्यात येणाऱ्या मनुष्यबळाच्या अनुषंगाने येणारा खर्च हा State Environment Impact Assessment Authority (SEIAA) च्या बँकखात्यामधील तरतुदीमधून भागविण्यास आणि सद्य:स्थितीत कार्यरत असलेल्या इतर संस्थांच्या सल्लागारांच्या सेवा दिनांक ३१.०१.२०२५ अथवा त्यापूर्वी तात्काळ संपुष्टात याव्यात या बाबीचा संदर्भ क्रमांक ०२ वरील शासन निर्णयामध्ये सुधारणा करुन समावेश करणे आवश्यक असल्याने दिनांक २१.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयामध्ये दुरुस्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**<u>शासन शुध्दीपत्रक</u> :-**

संदर्भ क्रमांक ०२ वरील शासन निर्णयामधील परिच्छेद क्रमांक ०३ नंतर परिच्छेद क्रमांक ०४ खालीलप्रमाणे वाचण्यात यावा. तसेच परिच्छेद क्रमांक ०४ हा परिच्छेद क्रमांक ०५ म्हणून वाचण्यात यावा.

" मे. प्रायमस पार्टनर्स प्रा.लि. या संस्थेकडून पुरविण्यात येणाऱ्या मनुष्यबळाच्या अनुषंगाने येणारा खर्च हा State Environment Impact Assessment Authority (SEIAA) च्या बँकखात्यामधील तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच, सद्य:स्थितीत विभागात कार्यरत असलेल्या इतर संस्थांच्या सल्लागारांच्या सेवा सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून तात्काळ बंद करण्यात याव्यात."

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०७१६५७२७५६०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHAHEEN SHOUKAT JAMADAR

Digitally signed by SHAHEEN SHOUKAT JAMADAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=9511e997a3875edbd0967fa4ceec8ac31b688631de1c7a35e19dc30961f0438d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=856C57BEF6C4D3EF93F04760CAD099503CA65FCA1896CF77AC80CEFD468D30EA, cn=SHAHEEN SHOUKAT JAMADAR
Date: 2025.04.07 16:58:19 +05'30'

**( शाहीन शौ. जमादार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

३) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, सायन, मुंबई.
४) संचालक, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) संचालक, माझी वसुंधरा अभियान, सायन, मुंबई.
६) संचालक, राज्य वातावरणीय कृती कक्ष, सायन, मुंबई.
७) सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) संचालक, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) शा.श्रे. १ तथा उप सचिव (तां.), पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व).
१०) शा.श्रे. २ तथा अवर सचिव (तां.), पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व).
११) निवडनस्ती कार्यासन तां.क. १.